**सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात पूरवणी मागणीद्वारे मंजूर सन २०१६-१७ योजनेतर योजना लेखाशीर्ष २२०५ ०२७१ (शासकीय मध्यवर्ती, विभागीय व जिल्हा ग्रंथालये) खाली निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मराग्रं २५२९/(प्र. क्र.२३०/१६)/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०१७

<u>वाचा :</u> १. ग्रंथालय संचालक यांचे पत्र क्र. ५२/यो.त्तर. पु.मा./२०१६-१७/१०५०३-०४, दि.२९/१०/२०१६
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र.- पूरक २०१६/प्र.क्र २०१/अर्थसंकल्प- ३, दि ०४/०१/२०१७

<u>**प्रस्तावना: -**</u>

ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडून सन २०१६-१७ मध्ये योजनेत्तर योजनांच्या अंतर्गत लेखाशीर्ष २२०५, कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०२) शासकीय मध्यवर्ती, विभागीय व जिल्हा ग्रंथालये, (०२) (०१) शासकीय मध्यवर्ती , विभागीय व जिल्हा ग्रंथालये (२२०५ ०२७१) (योजनेत्तर) अंतर्गत सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात संदर्भ क्र १ अन्वये पुरवणी मागणी प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ च्या परिपत्रकानुसार सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनातील योजनेतर पुरवणी मागण्यांचे प्रस्ताव वित्त विभागास सादर करुन निधी वितरीत करण्यात यावेत. त्यानुसार वित्त विभागाच्या मान्यतेनंतर वरील लेखाशीर्षाखाली रुपये ७.३९लक्ष एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ मध्ये ग्रंथालय संचालनालयाकडून राबविण्यात येणाऱ्या योजनेत्तर योजनांच्या अंतर्गत लेखाशीर्ष २२०५, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०२) शासकीय मध्यवर्ती, विभागीय व जिल्हा ग्रंथालये, (०२) (०१) शासकीय मध्यवर्ती , विभागीय व जिल्हा ग्रंथालये (२२०५ ०२७१) अंतर्गत एकूण रुपये ७.३९ लक्ष पुरवणी मागणीस वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

२. सदर लेखाशिर्षाखालील ०१-वेतन, ०६-दूरध्वनी वीज व पाणी शुल्क या उद्दिष्टांतर्गत अनुक्रमे रु. ३.३९लक्ष व रु. ४.०० लक्ष असे एकूण रु. ७.३९ लक्ष इतक्या रक्कमेस वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८७/व्यय ५, दि.२५/०१/२०१७ अन्वये मान्यता मिळालेली आहे.

३. वरील खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. यासाठी ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा निधी , लेखाशीर्ष “मागणी क्र. डब्ल्यू ४, २२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०२) (०१) शासकीय मध्यवर्ती , विभगीय व जिल्हा ग्रंथालये , (२२०५ ०२७१) योजनेत्तर”या लेखाशिर्षाखाली

चालु वर्ष २०१६-१७ करीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०२१७११५२३७१६०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2017.02.17 11:53:15 +05'30'

**( सु.हे. पाटणकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. प्रधान सचिव (उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
२. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
६. अवर सचिव (साशि- १), मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (साशि-५).